जिल्हा व राष्ट्रीय स्तरावरील शालेय क्रीडा स्पर्धेतील प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील शाळांना प्रोत्साहनात्मक अनुदानासाठी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : क्रीस्पर्धा ३२२४ /प्र.क्र. १८/क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १४ मार्च, २०२४.

**वाचा**

१. शासन निर्णय क्र. समाजकल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रीडा विभाग, राक्रीधो १०९६/प्र.क्र.३०३ क्रीयुसे-१, दि३१/०७/२०१७,
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. क्रीडाधो २०११/प्र.क्र.५५ क्रीयुसे-१, दि. १४/०६/२०१२
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. राक्रीधो २०१२/प्र.क्र.२५९ क्रीयुसे-१, दि. २६/०२/२०१४
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. क्रीयुसे/प्रअयोज/निवी/२३-२४/का-४, ५९२९/दि. ०९/०२/२०२४.

**प्रस्तावना**

भारतीय शालेय खेळ महासंघ पुरस्कृत शालेय क्रीडा स्पर्धांचे १४,१७,१९ वर्षाआतील मुला / मुलींच्या वयोगटात आयोजन करण्यात येतात आणि प्रत्येक वयोगटातील क्रीडा स्पर्धेस वयाबरोबर वर्गाची सुध्दा गट आहे. प्रत्येक शाळेत १४,१७,१९ वर्षाचे मुलां/मुलींचे सांघिक / वैयक्तिक खेळाडूंचे खेळाडू असतीलच असे नाही. शालेय क्रीडा स्पर्धेत जास्तीत जास्त शाळा / कनिष्ठ महाविद्यालयातील मुला / मुलींनी सहभाग घ्यावा. या दृष्टिकोनातून शाळा / कनिष्ठ महाविद्यालयांना प्रोत्साहित करण्याकरिता २०१२ क्रीडा धोरण समितीने जिल्हास्तरीय शालेय क्रीडा स्पर्धेतील सर्व खेळांची सर्व वयोगटातील कामगिरीचा विचार करून तसेच आंतरराष्ट्रीय स्पर्धेतील पदक विजेते खेळाडू तयार केलेल्या शाळा / कनिष्ठ महाविद्यालयांना प्रोत्साहनात्मक अनुदान देण्याविषयी क्रीडा धोरण समितीने केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने प्रचलित योजनेमध्ये कालानुरुप सुधारणा दि. २६/०२/२०१४ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. जिल्हा व राष्ट्रीय स्तरावरील शालेय क्रीडा स्पर्धेतील प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील शाळांना प्रोत्साहनात्मक अनुदानासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा व राष्ट्रीय स्तरावरील शालेय क्रीडा स्पर्धेतील प्राविण्य मिळविणाऱ्या राज्यातील शाळांना प्रोत्साहनात्मक अनुदानासाठी मागणी क्र. ई-३, २२०४- क्रीडा व युवक सेवा. १०४-क्रीडा व खेळ, पंचवार्षिक योजनांर्तगत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (२०) माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालय व खेळाचे प्रचालन (२०) (०२) माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालय व खेळाचे प्रचलनासाठी प्रोत्साहनात्मक अनुदान (२२०४-५६६२) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या

तरतुदीमधून रू.२,०३,००,०००/- (अक्षरी रू.दोन कोटी तीन लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये. तसेच, निधी विहित पद्धतीने दि.३१ मार्च २०२४ पुर्वी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश / नियम / शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौ. सं.क्र.११८/१४७१ दि२३/०२/२०२४ व वित्त विभागाचे अनौ. सं.क्र. ३२१/व्यय-५ दि. ०५/०३/२०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१८१७३१३९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.03.14 18:26:43 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई

५. मा. सभापती / उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई
६.मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
१०. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११ .आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१३. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१४ .अधिदान व लेखाधिकारी, मुंबई(क्रीडा संचालनालयामार्फत) .
१५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )
१६ .वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे(क्रीडा संचालनालयामार्फत) .
१७ .लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत )
१८ .सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१९ .वित्त विभाग व्यय ५- /अर्थ -८ , नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय मुंबई,
२० .कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती (क्रीयुसे-२)